५ ते १८ वयोगटातील शालेय विद्यार्थ्यांचे आधारकार्ड नोंदणी करण्याकरिता वर्षातून दोनदा शिबिर आयोजित करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
## शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण-२०१५/प्र.क्र. ३३/एस.डी-१

मादाम कामा मार्ग हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: ५ डिसेंबर, २०१६

**संदर्भ -** १) शालेय शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०१५/प्र.क्र.४९/एस.डी.१, दि. २१/०४/२०१५
२) केंद्र शासनाचे दि. ०७/११/२०१६ चे पत्र

**शासन परिपत्रक -**

शासनाने दि. २१/०४/२०१५ च्या शासन निर्णयान्वये शालेय विद्यार्थ्यांना आधार कार्ड देण्यासाठी अभियान राबविले असून दि. १३/०६/२०१६ च्या परिपत्रकान्वये आधारकार्ड नोंदणीचे काम १००% करण्यासाठी विशेष शिबीर आयोजित करण्याबाबत सूचना दिलेल्या आहेत. आजपावेतो ५ ते १८ वयोगटातील मुलांचे आधार कार्ड नोंदणीचे काम ८३% झालेले असून १००% पूर्ण करण्यासाठी तसेच ५ व्या वर्षी व १५ व्या वर्षी मुलांचे आधार कार्ड नोंदणी करणे व अदयावत करणे आवश्यक असल्याने शिक्षणाधिकारी (प्राथमिक व माध्यमिक) यांनी आपल्या जिल्ह्यातील शाळानिहाय वेळापत्रक जाहीर करुन वर्षातून दोन वेळा आधार नोंदणीचे शिबीर आयोजित करावे. सदर शिबिरामध्ये नविन आधार नोंदणी व बायोमेट्रिक अदयावत करण्याच्या सुविधा उपलब्ध करावी. नोडल अधिकारी यांनी सर्व शिक्षणाधिकारी यांच्याकडून आधार नोंदणीबाबतचे शाळानिहाय वेळापत्रक जाहीर करण्यासाठी आवश्यकते सहकार्य करावे. त्याचप्रमाणे सदर आधार नोंदणीचे वेळापत्रक लवकरात लवकर जाहीर करण्याची दक्षता घेण्यात यावी. नोडल अधिकारी यांनी ५ ते १८ वयोगटातील मुलांचे आधार नोंदणीच्या कामाबाबत वेळोवेळी आढावा घेऊन शासनास अहवाल सादर करावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२०५१६३२३५३४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Baban Ranganath Mali

Digitally signed by Baban Ranganath Mali
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=058a3365edca1bab7b5a512fa9b602a739d12b55819b89fd7154a7a28ccbaa1e, serialNumber=d2974b67a90018e618d5e11ffd00382f063542cc3d866753cfd5a4ad652b1908, cn=Baban Ranganath Mali
Date: 2016.12.05 16:49:36 +05'30'

**(बी.आर.माळी)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**
मा. मंत्री, शालेय शिक्षण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

**प्रत माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी**

१) आयुक्त (शिक्षण), आयुक्त शिक्षण यांचे कार्यालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई
३) संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे
४) शिक्षण संचालक (माध्यमिक), माध्यमिक शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५) शिक्षण संचालक (प्राथमिक), प्राथमिक शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
६) आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
८) विभागीय शिक्षण उपसंचालक, सर्व विभाग
९) प्राचार्य, जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था (सर्व)
१०) शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक/निरंतर), जिल्हा परिषद (सर्व)
११) शिक्षण निरीक्षक (दक्षिण / उत्तर / पश्चिम), बृहन्मुंबई
१२) शिक्षण प्रमुख / शिक्षणाधिकारी / प्रशासन अधिकारी, महानगरपालिका (सर्व)
१३) निवड नस्ती (एस.डी.१)